


# लखलख चंदेरी...



**संपादकीय**

सर्वप्रथम आपणा सर्वांचे स्वागत.

नेटाक्षरी आपल्या समोर नेहमीच काही वेगळं मांडण्याच्या प्रयत्नात सातत्याने असते व त्यामुळे नवनवीन अंकांचे वेगळेपण आपल्याला आनंद देते हे आपल्या प्रतिक्रीयांवरून आंम्हास जाणवले. याच नाविन्याची एक रेघ धरून आज एक अजून वेगळा विषय आपल्यासमोर ठेवत आहोत.

आजच्या नेटाक्षरी अंकात आपण अनुभवणार आहोत चांदणं. आजच्या धकाधकीच्या जीवनात कुठेतरी शीतलता हवीच असते. आजचा हा **"चंदेरी"** अंक आपणास ती शीतलता नक्कीच देईल व नेहमीप्रमाणेच आपल्याला आनंदित करेल ही आशा.

सुरुचि नाईक



यजमान संपादक –
**सुरुचि नाईक ( नागपूर )**

अतिथी संपादक –
**महेंद्र कुलकर्णी**
**ऊर्फ़ अंकल सॅम (कल्याण)**

सहसंपादक
**सोनाली घाटपांडे ( पुणे )**
**स्वप्ना कोल्हे ( नाशिक )**
**रेणूका रेपाळ ( अमेरिका )**
**नाम गुम जायेगा ( ठाणे )**
**आनंद माने (सोलापूर)**
अनुदिनी रुपांतर–
**सचिन काकडे**

नेटाक्षरी



चंद्र हा सांगतो
सांगतो बातमी
चांदण्यातून गं
चालले आज मी

चालताना हसे
ही झुळूक छानशी
बोलता ऐकतो
मेघ आसुसशी
मागुती कोण 'हे'
घेत आधार मी
चांदण्यातून गं
चालले आज मी

देऊनी वीज मी
घेतले चांदणे
सर्व माझ्या मनाचे
असे खेळणे
काय गेले "कुठे ?"
घेतले काय मी
चांदण्यातून गं
चालले आज मी

छंद माझ्या मनी
चांदण्यांनी दिला
सूर माझ्या गळी
केवडा माळला
शब्द देते 'कुणी'
मांडते तोच मी
चांदण्यातून गं
चालले आज मी

चंद्र हा सांगतो
सांगतो बातमी
चांदण्यातून गं
चालले आज मी

- स्वरांगी देव

swaraangidev16@rediffmail.com



# तू सर्वांग चांदणे

मी चकोर पिसा;
चांदण्यात चिंब,
तू गोड माधुरी;
मधाचा थेंब.

ह्रां देह तुझा;
चंद्ररश्मी रूपी,
ह्रां स्नेह तुझा;
अमृताची धुंद कुपी.

तू प्रेम लोटले;
अशरीर संजीवन,
जणू पीयूष गोठले;
चैतन्य चिद्घन.

तुझी साथ वैभवी;
मोतीयांचे संभार,
तू भावभैरवी;
मालकंस गंधार.

तू शीतल शालीन;
गर्भरेशमी शाल,
यामिनीचे प्रावरण;
चंदेरी विशाल.

ह्रां निळा आसमंत;
नव्हे; माझा कंठ,
तू सर्वांग चांदणे;
मी तृप्त आकंठ.

सारंग भणगे
sgbhanage@rediffmail.com

# मिलन

चांदणे हे साथ होते
चांदण्याचे श्वास होते
चांदणे ही स्वत:ला
बिल्गुन मिठीत होते

चांद्ण्याच्या साथीला
गाली उमलला सांजतारा
मकरंद तो घाली पिंगा
चुंबतो मुखचंद्रमाला
सोबतीला या क्षणाच्या
भोवती कोणीच नव्हते



घेतले ओठी ओठ जेन्व्हा
चांद गगनी लाजला हा
चावला तो ओठ जेन्व्हा
चांद तो गहीवरुन गेला
घेता कवेत तीजला
निथळले दोन अश्रु होते

सुटत नव्हता हात तो
सुटत नव्हती साथ ती
सरत नव्हती भावना
या मुक्या मिलनाची
परी देत वचने उद्याची
भेट ती होऊन जाते

--मकरंद

behere.makarand@gmail.com

## चल शोधू एक चाँद नवा .....

पाण्यावरुनी चालत जाऊ
क्षितिजापासून क्षितिजापर्यंत
सागराच्या तळ्याकाठी
चल शोधू एक चाँद नवा .....

चांदण्यांचे हात तुझे
माझी दिशाहीन नाव
स्वप्नांच्या या सागराचा
शोधू सोनेरी काठ नवा ....



हुंदक्यांची एक चारोळी
निशब्द शब्दात तुझ्या
कोंडलेल्या स्वरांना
दे नवा आवाज तुझा .......

हरवुनी तुझ्यात मी
अन आरसाही रिकामा
तू तुझ्या कुंचल्याने
दे मला आकार नवा .......

मुक्ता पाठक शर्मा

ds_mukta@yahoo.co.in



छपरावरचा दाह
कौलांना गेलेले तडे
घरात माझ्या तरीही
रातीचे चांदणे पडे

उडताना तू आभाळी
वेस माझी उंब-याची
उन्हंही नेहमीचीच
भिती न तुज वा-याची

दाह फ़क्त मलाच
तू जेव्हा परतत नाही
तुझा इशारा तुझी खुण
सावलीत विरून जाई

म्हणूनच सांगते सख्या
ओलं ऊन शोधू आता
आठवणी जपू सा-या
तुझ्या माझ्या जाता येता

**-चैताली म्हापसेकर**
chaitu_mpcds@yahoo.co.in

अतिथी संपादकांची ओळख –
**महेंद्र कुलकर्णी ऊर्फ़ अंकल सॅम (कल्याण)**

**अतिथी संपादकांच्या लेखणीतून**

हे स्वतः एक कवी. स्वतःचा संगणकाचा व्यवसाय. काव्याची आवड आणि काव्य हे मनातील अव्यक्तास व्यक्त करण्याचं एक साधन. त्यांच्या व्यक्तिमत्वाची ऒळख त्यांच्या कवीतेतून होते. अतिशय भावनाप्रधान असलेला हा कवी सामजिक कविता रचतो त्यावेळीचं त्याचं हळवं मन त्यांच्या कवितेतून मोकळं होतं आणि हाच कवी जेंव्हा शायरी रचतो तेंव्हा त्याच्या ख़ंबीर मनाचे गांभिर्य आणि तळमळ दिसून येते. त्यांच्या एका शायरीत ते म्हणतात-

**चढवाल जो तुम्ही तो रंग़ मान्य आहे**
**आरोप सभ्यतेचा आम्हा अमान्य आहे**
**गद्दार भोवती दुनिया, मदिराच साथ आहे**
**मद्यपि आम्हास म्हणती ती बाब गौण आहे**

समाजाकडे बघताना ह्यांच्यातील कवी जसा समाजाचे निरिक्षण करतो तसेच स्वतःचे निरिक्षण देखिल करतो व आपल्या आतील सर्वच भावनांचा गुणदोषांचा सखोल विचार करून गुण व क्षम्य अक्षम्य दोषांचे विवेचन इतरासमोर मांडण्याचे सामर्थ्य अंगी बाळगतो. अंकल सॅम यांच्या "भिका-याची पोर" या कवितेतील काही ओळींतून दिसून येते.

**नकळत मी तिच्याकडे टक लावून पाहू लागलो**
**फ़ाटक्या तिच्या कपड्यातून स्त्रीत्वाच्या खूणा शोधू लागलो**
**क्षणभरच झालं असं, मग मी भानावार आलो**
**कटोरीत चिल्लर भिरकावून मी पुढे चालू लागलो**

मानवी मनाचा तळ जाणून ठाव घेणारे कवी आज आपल्याला अतिथी संपादक म्हणून लाभले हे आपले अहोभाग्यच!

**- सुरुचि नाईक**






नमस्कार

नेटाक्षरी चा पहिला अंक वाचल्यापासूनच हा उपक्रम मनापासून आवडला होता मात्र ऑर्कुट बाहेरच्या जग़ात या उपक्रमाला ईतका प्रचंड प्रतिसाद मिळेल याची कल्पना नव्हती. नवकाव्याची आजच्या नवीन पिढीला असलेली ओढ यावरून दिसून येते. नेटाक्षरीचा हा प्रवास काव्य प्रवास नसून एक साधना आहे असे मी मानतो. केवळ आवड हा ह्या मागचा हेतू निश्चितच नाही तर मनोरंजन, नवकाव्याला नवकवीला प्रोत्साहन, साहित्य निर्मिती असे अनेक ध्येय ह्यामागे आहेत.

नेटाक्षरी सोबत अतिथी संपादकाचे नाते जुळताना जो आनंद होत आहे तो मांडणे कठीण आहे . या स्तुत्य उपक्रमात सहभागी होताना नेटाक्षरीला यशाच्या अनेक शुभेच्छा देऊन मी आपल्या सर्वांचे सहर्ष स्वागत करतो.

**- महेंद्र कुलकर्णी (सॅम अंकल )**
ccsmahendra@gmail.com

# ।। मस्तानी ।।




प्रत्येकाच्या मनात एक मस्तानी असते
अरे हळू, ही गोष्ट फ़क्त स्वतःशीच बोलायची असते
लग्नाची असली तरी ती फ़क्त बायको असते
आपली मस्तानी कोणालाच सांगायची नसते

लोक म्हणतात हा व्यभिचार आहे
जाणून बुजून केलेला एक अविचार आहे

बोलणारे लोक खोटारडे असतात
स्वतःपासून सुद्धा काहीतरी लपवत असतात
करतील तरी काय, सगळेच बाजीराव नसतात

लोक नेहमी असेच वागतात,
बाजीरावाचे प्रेम ग्रेट म्हणतात
तुमच्या आमच्या चारित्र्यावर शिंतोडे उडवतात
येताजाता नैतिकतेचे डोस पाजतात

प्रत्येकाला ठाऊक असते मस्तानी आपली होणार नाही
सगळ्यांचेच नशिब काही तेवढे थोर नाही
तरीही आपली मस्तानी जपायची असते
मनाच्या कप्प्यात खोल खोल दडवायची असते

**- सॅम अंकल**

# चांदणं

- सचिन काकडे
sachinskakade87@gmail.com



ये छोटू एक कटींग दे रे !!
का रे तुष्या आज ऑफ़िस वरून लवकर??
आणि इथे कट्ट्यावर आम्हाला दर्शन कस काय दिलत ?? शि-याने कट्ट्यावर बसत विचारल..
नाही रे, हाफ़ डे घेतला, मुड नव्हता आज.
का रे काय झाल? कुछ नही यार वही रोज रोज की टेन्शनस.
मग दुसरा जॉब शोध ना..
अरे काय सल्ला देतोयस???
प्रत्येक कंपनी सध्या टेक्निकल नॉलेजला महत्व देतेय, आम्ही काय बी कॉम ग्रॅजुएट, अकाऊंट्सच्या वर्तुळाबाहेर जग नाही रे आम्हाला. तुझी लाईफ खरचं सही आहे यार . एकदम हिंदी सिनेमातल्या हिरोसारखं जगण आहे.
आमच्या नशिबाच्या रेषा आम्ही हाताने कोरतोय, तुझ्यातर आधीच कोरलेल्या आहेत त्याही देखण्या नक्षीत, कॉलेजमध्ये आमच्या सोबत फक्त एक ऐश म्हणून होतास, आता आराम करतोयस, उद्या वडीलांचा बिझनेस सांभाळशील, एखाद्या दिवशी तुझे वडील तुला ऑफिसला नेऊन म्हणतील “श्रीरंग बेटा, आजसे तुम यहा इस खुर्सी पर बैठोगे, आजसे ये कंपनी तुम्हारी!!!!”
“गप रे साल्या, त्यातही केव्हढी लफ्डी आहेत. तुला नाही कळणार . ज्याला त्याला आपल ते कार्ट आणि दुस-याच सोनुल वाट्त. ज़्याची जळते ना त्यालाच कळतॆ”

माग़ून दिन्या गाडीचा हॉर्न वाजवत हात दाखवत़ू पुढे गेला. “साल्याला २ मिनिट थांबता येत नाही का ?” शि-या वैतागला.
“अरे कामात असेल यार! साहेबांच लग्न आलय चार दिवसांवर घाईत असेल.”
“हा आणि काम करणार पक्का कामचोर आहे दिन्या मागच्याच महिन्यात त्याच्या तातश्रींनी त्याला गाडी रिपेअर करून आणायला सांगितलेली तर याने त्यांना ‘नाही करत’ म्हणत उलट उत्तर दिलेल आठवत का ?”

“शि-या तू पण ना यार! शिंदे सरासारखा आहेस वॆळेवर तुला अश्या गोष्टी बरोबर आठवतात.
त्यांच्यासारखाच हातात लाल कलरचा पेन घेऊन फिरतोस दिसली चूक की मारला शेरा , सोड ना तुला काय घॆण देण !!”
“बिघड्ला आता तो, चांगल्यांच्यात गेला आपण काय जैसे थे. उद्या तुझ ही लग्न होणारचं”
“आणि साल्या तुझही ,!!” शि-याने मधेच वाक्य तोडलं
“ह , माझ कसले रे?”, “ काय रे काय झाल” , “काही नाही यार , सोड”

“तुष्या सांग का ते?”

" सांगतो ! आधी तू सांग तुझी नात्याची व्याख्या काय ?
का रे ? आज हा डायरेक्ट प्रश्न का ?
काही नाही रे , सहजच विचारतोय ।
शि-या , नातं म्हणजे काय ? मी त्याच्या डोळयात पहात विचारलं.
हं ! नातं , तुष्या नातं म्हणजे चांदणं , जसा रात्री पडणा-या चांदण्यात एकटा चंद्र दिसतो ना तसं काहीसे आपण असतो, इतके जवळ असूनही भरंवशाचं कुठलंच चांदणं नसतं त्याच्यापाशी, आणि हे चादणं म्हणजे तू करत असलेल्या प्रवासात तुला क्षणभराची, काही काळापुरती सोबत. मग ते कुठलंही असो, आई-बाप, बहिण भाऊ, मित्र मैत्रिणी , प्रेयसी बायको, मुलं बाळं, एका ठराविक वेळेपर्यंत ही आपल्या प्रवासात हे कंपनी देतात, आपल्या सोबत हसतात, रडतात, जगतात, त्यांनाही त्यांचा आपला प्रवास असतो रे, आपण फ़क्त ती सोबत एंजाय करायची. सुख़ दुख़ वाटून घ्यायचे, जशी तुला गरज असते तशी त्यांनाही गरज असते तुझ्या सोबतीची.

मात्र त्यात गुंतणं न गुंतणं सर्वस्वी तुझ्या हातात असतं. तुझ्या म्हणजे तुझ्या मनाच्या !! मी बघ तसंच करतो।।। अरे आज आहे, उद्या नाही, कशाचाच भरवसा नसतो हे शापित सत्य आहे मित्रा. आपलं असं काहीच नसतं , ना कुठली वस्तु, न धन, न माणसं. मग कशाला उगाच या गोष्टींचं ओझं घेऊन फ़िरायचं हे माझं , ते माझं, हा माझा, तो माझा, हे काहीच नसतं तुष्या, इथे आपण असतो, आपण, आपणच आपल्यासाठी जगायचं असतं,।।।

मी तर म्हणतो अश्या गोष्टींत गुंतण्यापेक्षा समोरचा प्रत्येक दिवस मजेत घालवायचा।।। आणि हसत शेवटापर्यंत प्रवास करायचा।।। सोबतच्या चांदण्याबरोबर।।। याच प्रवासाला जगणं म्हणतात।।। म्हणजे कमीत कमी मी तरी मानतो।

एका दमात हे सगळं सांगून शि-याने खिश्यातले सिगारेटचे पकिट काढले। माझ्यासमोर केले, मी हातानेच नको म्हटलं
'आज खरंच मूड नाही रे'
अच्छा ! आता सांग काय प्रॉब्लेम झाला ?
काही नाही यार । श्रेयाचा फ़ोन आला होता
मग ?
काही नाही... तिचं लग्न ठरलंय...
कधी ? कोणाशी ?
आजच कळवलं तिनं. मुलगा पुण्यात सॉफ़्टवेर इंजिनियर आहे. एम एन सी मधे जॉब. चांगलं पॅकेज आहे, आज प्रोग्राम. पुढच्या महिन्यात तारीख... लग्नानंतर लगेच परदेशात जाणार.



अरे पण तुझ्यासाठी थांबणार होती न ती ?
शि-याने वैतागत विचारलं. त्याचा आवाज मोठा होत चालला. टपरीवरचा भय्या हातातलं पान बाजूला ठेवून आमच्याकडे बघायला लागला .
समोरून शि-याच्या घरची गाडी येत होती. त्याचे बाबा आत होते. "शि-या डॉन !!" मी त्याला सावध केले. त्याने हातातली सिगारेट फ़ेकली पटकन.
"श्रीरंग, चल रे ! " त्याच्या वडिलांनी हाक मारली.

"चल , रात्री कट्ट्यावर भेटू, मिस कॉल टाक."

शि-याने पाठीवर थाप मारली आणि उडी टाकून निघून गेला..
प्रेम म्हणजे  काय ? नाती म्हणजे काय ?
काही प्रश्नांची आपल्याला जाणीव असते . त्यांची उत्तरंदेखील काही प्रमाणात माहित असतात. पण पण या प्रश्नांची जाणीव आणि उत्तरं माहित असून काही उपयोग होत नाही. त्यांचं अस्तित्व जास्तच गूढ आणि गर्विष्ठ असतं. श्रेयाचे शब्द अजून कानात घुमत होते. '  व्हायचं तेच झालं, तरी तुला मी सांगत होते...  तुझं म्हणणं मला पटतंय रे.. पण मी घरच्यांना नाही रे पटवून देऊ शकत... ' एरव्ही शब्दांशी खेळणारा मी ,पण आज तेच शब्द आरपार काळजात घुसत गेले.

माझ्यासारखेच असे कित्येकजण असतील ज्यांच्या स्वप्नांचा दुनियेच्या या व्यावहारिकपणामुळे निखारा झाला असेल. आणि आज त्यात  अजून एक निखारा.  आग भडकतच चाललीये साला... प्रेम...प्रेम खेळ आहे सगळा ... दोन मनं काही कारण नसताना...नसताना की असताना ? शिट ! आज माझंच काही खरं दिसत नाही ... का या गुंत्यात अडकलो ?

आजवर इतकं लिहीलं, वाचलं, पाहिलं , अनुभवलं, ...कशाचाही काही उपयोग नाही. आजही विचार करून काय असा तीर मारणार ... जाऊ दे , उलट या विचारांच्या गोंधळात पडलं की जीवघेणा त्रास सुरु होतो। काही प्रश्न उत्तरांना आकार नसतो हेच खरं...पहिलं अशावेळी काही लिहून काढावंसं वाटायचं. पण आता शि-याचे शब्द आठवतात, ' शब्दांत जगणं सोड मित्रा , व्यावहारिक हो ! दुनियादारीला किंमत नसते.जो तो स्वार्थासाठी जगतो...' तेव्हा या मुद्द्यावर भांडायचो पण आता त्याचंच पटतंय. आपलीच माणस आपल्याला हे सांगत असतात, पावलोपावली जाणीव करून देतात...
आपलीच माणसं पैशासाठी अशी परकी व्हावीत , आणि आपण त्यांच्यासाठी सारं काही विसरून झटत रहायचं ... का ? कशासाठी ? आता अवस्था अर्जुनासारखी झालीये ... तोही तिथं कुरुक्षेत्रावर आपल्या माणसांच्या विरोधात लढायला तयार नव्हता ... आणि इथं मी आपल्या माणसांसी व्यावहारिक नाही वागू शकत... त्यांना सोडू नाही शकत... आता काय ? मी सोडण्याचा प्रश्नच कुठे येतो ?

'चांदण्यांनी भरलेल्या आभाळाला नजर लागावी आणि त्याला हवा असलेला त्याच्या जवळचा एक तारा त्याच्या नकळत निखळून पडावा ... आणि त्यांनी फ़क्त ओल्या डोळ्यांनी ते पहात रहावं... निखळलेला तो तारा कुठल्याश्या सरोवरात पडल्यानंतर शांत होऊन आपल्या नव्या अस्तित्वात स्वच्छंदी  जगणं जगत राहिलेला  चंद्राने पहायचं आणि त्यातच आपलं सुख मानायचं असतं' हा नियतीचा नियम आहे ... नियतीचा नियम त्याच्यापुढे माझ्यासारख्यांचं काय ?

शि-या बोलत होता त्यात तथ्य होतं . माणुस किती वेळ कुणाबरोबर राहू शकतो ? पाच मिनिटं, पाच दिवस, पाच वर्षं , ... त्यांनाही त्यांची दुखणी असतातच की  त्यांनाही त्यांचं जग असतंच... आपणही त्यांच्यासारखेच... व्यवहार हा जगण्यातलाच एक भाग , मग भले त्यात स्वार्थ असू दे ... खिशात मोबाईल वाजला... कुणीतरी मिस कॉल दिला ...उगाच हसलो... कुणाचा असेल ? मिस कॉल देणारी तर गेली  आता कोण ???
लॉक खोलले ... घरचा होता.
बॅग घेऊन गाडीला कीक मारली
घराची वाट धरली......

नेटाक्षरी हा अंक विनामूल्य वितरीत केला जातो आपल्या सुचना ,टीका आणि सहकार्य यांचे स्वागत आहे .

netaksharee@gmail.com